**श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर, ता. पंढरपूर जि. सोलापूर या कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु.६० कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यास शासनहमी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१९/सपववि/प्र.क्र.९३/अर्थबळ**
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०२ जुलै, २०२०

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-१०९९/ प्र.क्र.६८/शा.हमी, दि.५/११/१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:शाहमी-१००८/प्र.क्र.१८/शा.हमी,दि.२८/४/२००८
३) मा.मंत्रिमंडळाने दिनांक १५ डिसेंबर, २०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेला निर्णय
४) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक:शाहमी-२०१९/ सपववि/ प्र.क्र.९३/ अर्थबळ, दि.१९.१२.२०१९
५) मा.मंत्रिमंडळाने दिनांक २७.४.२०२० रोजीच्या बैठकीत घेतलेला निर्णय
६) शासन शुध्दिपत्रक,वित्त विभाग, क्रमांक:शाहमी-२०१९/सपववि/प्र.क्र.९३/अर्थबळ, दि.१३.०५.२०२०

**<u>प्रस्तावना</u> -:**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या प्रस्तावावर मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर, ता. पंढरपूर जि. सोलापूर या साखर कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु.६० कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यास शासनाच्या प्रचलीत धोरणानुसार अटी व शर्तींचा समावेश करुन शासन हमी देण्याबाबतचे आदेश संदर्भाधिन दि.१९.१२.२०१९ रोजी निर्गमित करण्यात आलेले आहेत. तथापि, शासन निर्णयातील अटी व शर्ती महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस मान्य नसल्याने श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर, ता. पंढरपूर जि. सोलापूर या कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु.६० कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यास विनाअट थकहमी देण्याबाबतचा प्रस्ताव सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाने सादर केला होता. सहकार विभागाने सादर केलेल्या प्रस्तावावार मा. मंत्रिमंडळाने दिनांक २७.४.२०२० रोजीच्या बैठकीत "श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर, ता. पंढरपूर जि. सोलापूर या कारखान्याच्या संचालक मंडळाची सामुदायिक हमी ठरावाव्दारे घेण्यात यावी. उर्वरीत अटी व शर्ती रद्द करण्यात याव्यात असा निर्णय घेण्यात आल्याने त्यानुसार शासन शुध्दिपत्रक दि. १३.०५.२०२० निर्गमित करण्यात आलेले आहे. तदनंतर सहकार पणनव वस्त्रोद्योग विभागाने सदर शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जाबाबत प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन हमीवर कर्ज घेण्याची मुदत शासन निर्णय दि.१९.१२.२०१९ निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांपर्यंत वाढवियाची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-:

श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर, ता. पंढरपूर जि. सोलापूर (ऋणको) या कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून (धनको) रु.६० कोटी (रु.साठ कोटी फक्त) अल्पमुदत कर्ज घेण्यासाठी संदर्भाधिन दि.१९.१२.२०१९ अन्वये शासन हमी देण्यात आलेली आहे. सदर शासन हमीवर कर्ज घेण्याची मुदत शासन निर्णय दि.१९.१२.२०१९ निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांपर्यंत वैध होती. तथापि, सदर कालावधीत संबंधित कारखान्यांकडून कर्जाची उचल न झाल्याने त्यास अजून ६ महिन्यांची (दि.१८.१२.२०२० पर्यंत) मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. संदर्भाधिन शासन शुध्दिपत्रक दि.१३.५.२०२० मधील अटी व शर्ती कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००७०२१३५५५३७००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

**(ज.बा.कुलकर्णी)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपालाचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई,
६) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई (५ प्रती)
१०) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
११) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४.
१३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्स्कवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१

१४) इंडियन नॅशलन कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई -२५.
१५) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१.
१६) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
१७) प्रधान सचिव(सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१८) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजी नगर, पुणे-४११००५.
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२३) कार्यकारी संचालक, श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर, ता. पंढरपूर जि. सोलापूर
२४) वित्त विभाग (ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/व्यय-२), मंत्रालय, मुंबई-३२.
२५) कक्ष अधिकारी (३ स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२६) निवडनस्ती/ अर्थबळ.

-------------